कविकुलगुरु कालिदास संस्कृत विश्वद्यालय, रामटेक यांच्या ग्रंथालय विकास या योजनेसाठी प्रशासकीय मान्यता तसेच निधी वितरीत करणेबाबत

**महाराष्ट्र शासन**
उच्च व तंत्रशिक्षण विभाग
शासन निर्णय क्रमांकः केएसयु २०११/(१६०/११)/विशि-२
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : १५ नोव्हेंबर, २०११.

पहा :- १) शिक्षण संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्र. ककासवि/२०११/अभि/१०५९, दि. २६ जुलै, २०११

२) कुलसचिव, कविकुलगुरु कालिदास संस्कृत विश्वद्यालय, रामटेक यांचे पत्र क्रः केकेएसयु/२०११/ग्रंथा./१५०३, दिनांक २९.०९.२०११

**प्रस्तावना :**

कविकुलगुरु कालिदास संस्कृत विश्वविद्यालय, रामटेक या विश्वविद्यालयाच्या ग्रंथालय विकास या योजनेंतर्गत नवीन योजनेंतर्गत ग्रंथ नियतकालिके, फर्निचर खरेदी तसेच ग्रंथालयाच्या संगणकीकरणासाठी साधनसामुग्री खरेदी करण्याचे प्रस्तावित असून संदर्भाधीन पत्र क्रमांक १ व २ अन्वये शासनास सादर केला आहे. सदर योजना ही नवीन योजना असल्याने या योजनेस प्रशासकीय मान्यता देणे तसेच या योजनेसाठी सन २०११-२०१२ करीता निधी उपलब्ध करुन देण्याचा प्रस्ताव प्रस्तुत नस्तीवर विचाराधिन होता.

**शासन निर्णय :-** कविकुलगुरु कालिदास संस्कृत विश्वविद्यालय, रामटेक या विश्वविद्यालयाच्या ग्रंथालय विकास या योजनेच्या नवीन योजनेंतर्गत ग्रंथ नियतकालिके, फर्निचर खरेदी तसेच ग्रंथालयाच्या संगणकीकरणासाठी साधनसामुग्री खरेदी करण्यात येणार असून सदर योजनेस प्रशासकीय मान्यता देण्यास तसेच सन २०११-२०१२ मध्ये या योजनेसाठी खालील अटींस अधिन राहून रुपये ७.४० लक्ष (रुपये सात लक्ष चाळीस हजार फक्त) इतकी तरतूद सदर विश्वविद्यालयास वितरित करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

१) विद्यापीठाच्या ग्रंथालयात वाढत्या ग्रंथ व नियतकालीकाकरीता कपाटे, वाचन कक्षाकरीता फर्निचर तसेच ग्रंथालयातील कार्यालयीन कामाकरीता तसेच वाचकांना अद्ययावत सुविधा संगणक, प्रिंटर, एपीएस, बॅटरीज इत्यादी साधनसामुग्रीची खरेदी **शासन मान्य आर्थिक नियमावलीनुसार निविदा प्रक्रीया करुनच करण्यात यावी.**

२) पुस्तके / नियतकालिके खरेदी संबंधीत शैक्षणिक विभागातील प्राध्यापकांच्या शिफारशीनुसार करण्यात यावी.

२. सदरहू मंजूर झालेली तरतुद खर्च करण्याची सर्वस्वी जबाबदारी संचालक (उच्च शिक्षण ) महाराष्ट्र राज्य, पुणे यांची राहील. वरील अनुदानाची सर्व कागदपत्रे व हिशेब महालेखापाल, महाराष्ट्र-१ मुंबई किंवा प्रकरणपरत्वे महालेखापाल -२ नागपूर त्यांनी सदर कामाकरीता प्राधिकृत केलेले अधिकारी यांना तपासण्याचे अधिकार असून, त्यांनी मागणी केल्यास, सर्व कागदपत्रे त्यांच्याकडे तपासणी करीता विद्यापीठाने सादर केली पाहिजेत. विद्यापीठास ज्या उद्दिष्टासाठी मंजुर केलेल्या अनुदानाचा वापर त्याच उद्दिष्टासाठी करावा आणि त्याबाबतचे विनियोजन प्रमाणपत्र (Utilisation Certificate) संबंधितांना विहित वेळेत सादर करण्याची दक्षता घेण्यात यावी.

३. सदर खर्च " मागणी क्रमांक - डब्ल्यु-२, २२०२-सर्वसाधारण शिक्षण ०३, विद्यापीठीय व उच्च शिक्षण १०४, विद्यापीठांना सहाय्य, पंचवार्षिक योजनांतर्गत योजना १०२, विद्यापीठांना सहाय्य, (००) (१४) कवी कालिदास संस्कृत विद्यापीठ, नागपूर यांचा विकास (२२०२ ३४९५), ३१ सहाय्यक अनुदान (वेतनेतर)" या लेखाशिर्षाखाली खर्च घालण्यात यावा.

४. हा शासन निर्णय, वित्तीय अधिकार नियम पुस्तिका भाग पहिला उप विभाग तीन मधील अ.क्र. ४-नियम क्रमांक २७(२) (अ) नुसार प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकारान्वये आणि वित्त विभागाच्या शासन परिपत्रक क्र. अंदाज २०.११/प्र.क्र.९३/२०११/अर्थसंकल्प-३, दिनांक २१.०९.२०११ अन्वये प्राप्त झालेल्या अधिकारान्वये निर्गमित करण्यात येत आहे.

५. हा शासन निर्णय महाराष्ट्र शासाच्या www.maharashtra.govt.in या संकेत स्थळावर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक क्रमांक २०१११११४१४१००९००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

( वि. मा. पाटील)
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रति,

१) मा. राज्यपाल तथा कुलपती यांचे प्रधान सचिव, राजभवन, मलबार हील, मुंबई,
२) संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे,
३) सह संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, नागपूर,
४) कुलगुरु, कविकुलगुरु कालिदास संस्कृत विश्वविद्यालय, रामटेक, नागपूर
५) कुलसचिव, कविकुलगुरु कालिदास संस्कृत विश्वविद्यालय, रामटेक, नागपूर
६) महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता)-१/२ महाराष्ट्र, मुंबई / नागपूर
७) महालेखापाल, (लेखा परीक्षण) -१/२ महाराष्ट्र, मुंबई / नागपूर
८) जिल्हा कोषागार अधिकारी, नागपूर/ पुणे
९) नियोजन विभाग, (का-१४७१) मंत्रालय, मुंबई.
१०) वित्त विभाग,(व्यय-५) ( अर्थसंकल्प-३/८) मंत्रालय, मुंबई.
११) मा. प्रधान सचिव,उच्च व तंत्र शिक्षण विभाग, यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
१२) उप सचिव (विशि), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
१३) अवर सचिव (साशि-१), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई,
१४) निवड नस्ती (विशि-२), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई,